। हरि ॐ ।

# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

अंक क्र ३३ दि २९ जुन, २००९





**संपादक**

अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

**सहसंपादक**

सोनाली घाटपांडे ( पुणे )

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सारंग भणगे ( पुणे )

सचिन काकडे ( पुणे )

भारती सरमळकर (पुणे)

**अतिथी सपादक**

हरीश दांगट

**या अंकात**

अतिथी संपादकांचे

मनोगत

व

अभंग



हा विनामुल्य अंक मिळवण्यासाठी तसेच सूचना अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी mailto:netaksharee@gmail.com

भारत देशाला संतांची उज्वल परंपरा आहे. या संतांमधले बहुतेक संत हे कवी होते. कबीर, कमाल, सूरदास, रैदास, दादुदयाल, सुंदरदास, नानक, मलुकदास, तुलसीदास, सहजोबाई, मीराबाई, ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, चोखामेळा, गोरा कुंभार, जनाबाई, बहिणाबाई, एकनाथ, रामदास, सावता माळी अशा अनेक संतकवींनी साहित्याचा महासागर निर्माण करून ठेवलेला आहे. संत हा शब्द ‘सत’ या संस्कृत शब्दावरून आलेला आहे. सत म्हणजेच सज्जन, निर्मळ. या संतांची प्रमुख लक्षणे म्हणजे समस्त जीवमात्रांबद्दल करूणा, भूतदया आणी ईश्वराठायी एकरूप होण्याची क्षमता. त्यांच्या याच अलौकिक गुणांचे प्रतिबिंब त्यांच्या साहित्यात पडलेले दिसून येते. विशेष म्हणजे बहुतांश संत हे अशिक्षित वा अल्पशिक्षित होते. असे असूनही त्यांनी अतिशय आशयघन, रसाळ आणी उच्च साहित्यीक व मानवी मुल्ये असलेले साहित्य-भंडार निर्माण केले. ‘मानवतावाद’ हाच यातील बहुतांश साहित्याचा पाया असल्याचे दिसून येते. भाषेचा बडेजाव न माजवता आपल्याला आलेले खरेखुरे अनुभव सरळ साध्या शब्दात मांडल्यामुळेच हे साहित्य अतिशय उच्च पातळीवर जाऊन पोहोचते.

केवळ महाराष्ट्रातल्या संतांबद्दल बोलायचे झाले तरी त्यांच्या साहित्याचे रसग्रहण करायला लक्षावधी पाने लिहावी लागतील. ओवी, अभंग, गौळण, लोकगीत, पद, विराणी, पाळणे, भूपाळी अशा विविध आकृतिबंधामध्ये महाराष्ट्रातील संत-साहित्य उपलब्ध आहे. आत्यंतिक भावपूर्णता व परिणामकारकता ही वैशिष्टये या सर्वच प्रकारांमध्ये आढळून येतात.

या अंकात आपण केवळ ‘अभंग’ या काव्यप्रकाराचाच सहभाग करून घेत आहोत. संत तुकाराम महाराजांची ‘अभंगवाणी’ या विषयात विशेष प्रसिद्ध आहे. प्रत्येकाने आवर्जून वाचावा असा हा ग्रंथ आहे.

‘अभंग’ हा न भंगणारा, म्हणजेच सार्वत्रिक व सार्वकालीन सत्य असतो. अभंग वृत्तात प्रत्येक चरणात चार ओळी असतात. पहील्या तीन ओळींमध्ये प्रत्येक ओळीत सहा अक्षरे, तर शेवटच्या ओळीत चार अक्षरे असतात. दुस-या व तिस-या ओळीत यमक जुळवलेले असते.

जेथे जातो तेथे
तू माझा सांगाती
चालविशी हाती
धरोनिया

चालो वाटे आम्ही
तुझाचि आधार
चालविशी भार
सवे माझा



संत तुकाराम

बोलो जाता बरळ
करिसी ते नीट
नेली लाज, धीट
केलो देवा

तुका म्हणे आता
खेळतो कौतुके
झाले तुझे सुख
अंतर्बाह्य

विटाळांचे दोष
नको देणे घेणे
अंताशी उरणे
फक्त देही...!

जाईन येथून
शुन्यच घेऊन
कशासाठी भेद
करायचा ...!

असो ओवी मुखी
वा असो कुराण
भक्तीचाच वाण
शाश्वतीचा...!

तरी कसे होती
आपुल्यात वाद
अरे माणसा तू
हरवला...!

नको विसरणे
देवा तुझी माया
अखेरची छाया
तुझी असे...!

जेव्हा देव झाला
महाराचा सखा
सावळा विठ्ठल
भक्तीपायी...!

देवा स्विकारावे
माझेही नमन
बावरले मन
करा शांत...!

**--- वर्षा पाटील**



देहाच्या मंदिरी
मनाचा हा दिवा
प्रेमाने पेटवा
चहूकडे

दिव्याची या वात
जळु दे अखंड
करील ब्रह्मांड
तेजोमय

प्रेम सुख ओढ
मनात साठली
भरून वाहिली
प्रभुसंगे

आटवले रक्त
दाही दिशा फिरी
मिळकत खरी
हरिनामी

मोह माया पाश
तोडशील आज
होउनिया मुक्त
अंतरंगी

गात्र गात्र गाई
एक नाम त्याचे
तोचि मन वाचे
नकळत

नाही कुणा दिसे
मनी त्याची छबी
गाभा-यात उभी
मुर्तीमंत

होऊ कशी आता
तुझी उतराई
या जन्मापाई
धन्य झाले

**--- भारती सरमळकर**

पंढरीचा राणा
सावळाचि हरी
करूणा पाखरी
भक्तांवर

भजनात दंग
गाऊनी अभंग
सारा संत संग
पंढरीला

नामाचा गजर
वैष्णवांचा मेळा
भक्तीचा सोहळा
अनुपम

मुक्ताईची ओवी
तुक्याचे अभंग
टाळ नी मृदुंग
निनादती

**-- नितीन पवार**



वैकुंठ अवघे
एकरूप झाले
ऐसे साकारले
रूप तुझे

मन झाले टाळ
देह हा मृदुंग
आत्मा पांडुरंग
होत असे

जाहला असा हा
ब्रह्मानंद आज
आनंदाला साज
आनंदाचा

आस ही लागली
माझिया जीवाला
धाव बा विठ्ठला
मायबापा

**-- मंगेश**



चिपळी चिपळी
मन अचपळी
धाव घे अवेळी
भगवंती

धावले धावले
थकले थांबले
लोटांगणी गेले
चरणाशी

फुटले ना शब्द
रूपापुढे अब्द
झाले शांत स्तब्ध
गुणातीत

मनी इच्छा सुप्त
कर जीवा मुक्त
होई मुक्ता तृप्त
तव संगात

**-- मुक्ता पाठक शर्मा**

महर्षी नारद
'नारायण' गाती
वाल्मिका सांगती
'राम' म्हण

दुर्लभ हा जन्म
आहे माणसाचा
उद्धार स्वतःचा
रामनामे

संतश्री कबीर
कैवल्याचे ज्ञानी
घेऊ सारे ध्यानी
वाणी त्यांची

मोक्षाचा हा मार्ग
आहेच दुष्कर
होईल सुकर
राम नामे

याच जन्मामध्ये
उघडेल द्वार
नाम धारोधार
घेतल्याने

मोक्षप्राप्ती द्वार
उघडे दशम
गाता रोम-रोम
राम नाम

संचित संपते
क्रियमाण स्तब्ध
शिथील प्रारब्ध
होते नामे

-- अरविंद चौधरी



जडण-घडण
होते बाळपणी
तशी मोठेपणी
वृत्ती होते

स्वप्न नि वास्तव
अंतर तयात
रमावे स्वप्नात
अल्पवेळ

दुःखातही सुख
सुखात आनंद
कर्मात मुकुंद
असो द्यावा

जया अंगी सदा
निर्लोभ सत्यता
राही सरलता
जाणे ब्रह्म

ठेवू मनी राम
कंठी राम राम
औषध हा राम
रामबाण

-- अरविंद चौधरी

जीवन हे व्याधी
वासना त्या बाधी
म्हणोनी समाधी
घेई ज्ञाना

भक्तीचा सोहळा
वाहतो विमळा
मिळती ओहळा
बहु धारा

सूर्य प्रकटला
प्रकाश दाटला
चिन्मय कोंडला
दिठीमाजी

भक्तिरस वाहे
आळंदी ती नाहे
देहू गावी राहे
तुकाराम



तुका हो भणंग
भक्तीमध्ये दंग
नामाचे तरंग
मन डोही

संसार हो व्यर्थ
सरे मोह स्वार्थ
उरला परमार्थ
उपकारा

अमृताचा वीट
विठ्ठल अवीट
ते पायाची वीट
तुका झाला

तुटे मोह पाश
देह अवकाश
मृत्यु सावकाश
दैवाधीन

विठू रहावेना
दूर पहावेना
वियोग साहेना
तुकोबाचा

दूत धाडियले
नियम मोडीले
भक्तासी भिडले
अद्वैतात

वैकुंठी पोचला
विठ्ठल भेटीला
आणीक जाहला
कळस तो

**-- सारंग भणगे**

*शेतात पेरून
आलो सारे धन
आता माझे मन
तुझे पायी*

*पेरीली जवार
पेरीली बाजरी
मुर्ती ती साजरी
लोचनात*

*तुला देण्यासाठी
काही ना उरले
मातीत पुरले
सारे काही*

*तुझ्या नावे सारे
दिले उधळून
मागती वळून
ना पहाणे*

*सुख आणी दुःख
मज नाही भेद
आता तुझा वेध
माझ्या जीवा*

*न मागे मी काही
मज वाटे लाज
माझे सारे काज
तुला ठावे*

***-- हरीश दांगट***



*पंढरीस जातो
घेउनिया मन
चित्ती समाधान
लाभे त्यास*

*ऐकावी रसाळ
संतांची कवने
कायावाचा मने
रिझवावी*

*संत सज्जनांचा
जोडूनीया संग
चित्त व्हावे दंग
हरीनामी*

*भक्ती विठ्ठलाची
सुखाचे साधन
मेळवावे धन
परमार्थी*

*परतीच्या वाटे
होती पाय जड
विठूची आवड
तीच असे*

***-- हरीश दांगट***

पंढरीची वारी । जयांचिये घरी । पायधुळी शिरीं । वंदीन त्यांची ।।
संत तुकाराम

पंढरीची वारी हा एक चमत्कारच मानला पाहिजे. एखादी छोटी सत्यनारायणाची पूजा घालताना, पाच पन्नास लोकांचे नियोजन करताना किती कठीण जाते. इथे तर लाखोंचा समुदाय तीन आठवडे शिस्तबद्धपणे चालत रहातो. कित्येक परदेशी समाज-शास्त्रज्ञ वारीचा अभ्यासा करताना अचंबीत होतात. पंढरीची वारी कधी सुरू झाली याचा ऊल्लेख सापडत नाही. ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत यांनी वारी केल्याचा उल्लेख आहे. त्यानंतर ज्ञानेश्वर माउलींनी या वारीला लोकप्रियता मिळऊन दिली. मधल्या काळात कित्येक सामाजिक बदल झाले, कित्येक राज्यकर्ते आले नी गेले, पण या प्रथेत खंड पडला नाही. उलट दिवसेंदिवस वारीची लोकप्रियता वाढतच गेली. या वारीतील सर्वात उल्लेखनीय गोष्ट म्हणजे इथे जाती-पाती, उच्च-नीच, गरीब-श्रीमंत, सुशिक्षीत-अशिक्षीत असे सारे भेद गळून पडतात. वारीत लोक मनात कुठलीही इच्छा वा अपेक्षा ठेऊन जात नाहीत.

देवपुजेवरी ठेऊनिया मन । पाषाणा पाषाण पूजी लोभे ।।

वारी करणा-यांना तुकाराम महाराजांचा वरील अभंग माहीत असतो. एवढ्या निरपेक्षपणे उन्हा-पावसात लोक चालतात, हे आजच्या चंगळवादी समाजात घडते, हा एक चमत्कारच आहे. वारीत खरोखर शांती व समाधान मिळते का ? शेवटी काय थोडे फार शिक्षीत व बाकी अशिक्षीत लोक असतात, देवाच्या भेटीने असे काय मिळते? हे प्रश्न पडणे सहाजिकच आहे. याचे उत्तर शोधण्याचे काम न्युरो-थिऑलॉजी नावाची वैद्यक-शास्त्रातील शाखा करते. आजवर आधुनिक वैद्यक-शास्त्राने धार्मीक वा अध्यात्मीक बाबींची सांगड घालण्याचे टाळले. पण दिवसेंदिवस वाढत असलेला तणाव व त्यामुळे येणा-या शारिरीक व मानसीक व्याधी यावर उपाय शोधण्याचे संशोधन हार्वर्ड आणि जॉन-हॉपकिन्समधील न्युरो-थिऑलॉजी शाखेचे शास्त्रज्ञ करत आहेत. या संशोधनासाठी त्यांनी वेगवेगळया धर्माच्या लोकांना त्यांच्या प्रार्थना ऐकवल्या. या दरम्यान डॉक्टरांनी त्यांच्या मेंदूतील बदलांची नोंद ठेवली. या प्रयोगाटून असे सिद्ध झाले की या सर्व लोकांचा माणासीक तणाव कमी झाला. अशा प्रकारचा साधा प्रयोग आपणही करू शकतो. जेंव्हा मानसीक तणाव वाढलेला असेल तेंव्हा शांत बसून, डोळे मिटून पसायदान म्हणून पहा. पासायदान ही एक महान प्रार्थना आहे. यात आपण स्वतःसाठी काहीही न मागता जगासाठी मागतो. अशा प्रकारे आधुनीक तंत्रज्ञानानेसुद्धा भक्तीचे महत्व मान्य केलेले आहे.

आता मी थोडे माझ्या अनुभवाबद्दल सांगतो. मी पूर्ण वारी कधीच केलेली नाही. जी काही थोडीफार केली ती वयाच्या आठ ते बारा वर्षांचा असताना केली. आमचे घर मुंबई-नगर महामार्गावर आहे. तुकाराम महाराजांचे गुरु चैतन्यमहाराज यांची पालखी या मार्गाने जात असे. माझी आई माझ्या डोक्यावर पाण्याचा छोटा माठ देऊन वारक-यांना थंड पाणी वाटण्याचे काम मला देत असे. पाणी पटकन वाटून टाकायचे आणी माठ घरी ठेऊन वारीत सामील व्हायचे. तिथून पुढे वारीबरोबर चार किलोमिटर जायचे, मुक्कामाच्या ठिकाणी जेवायचे व घरी यायचे. वारीत वारक-यांबरोबर अभंग म्हणायचे, टाळ वाजवायचे असा कार्यक्रम असे. कधी वीणा घेऊन ग्यानबा-तुकाराम करायचे. वाटेवर जागोजागी लोक वीणा घेणा-याच्या पाया पडत, वीणा घेणारा अगदी लहान असेल तरीही. पुढे हायस्कुलला गेल्यावर वारीचे आणी शाळेचे वेळापत्रक न जमल्यामुळे वारीचा उपक्रम बंद पडला. हे सर्व झाल्यावर तीस वर्षांनी मी कविता लिहायला सुरुवात केली. माझ्या सुमारे तीस कविता अभंग किंवा भक्तिगीत या सदरात मोडणा-या आहेत. लहान असताना अजाणतेपणी केलेल्या वारीचा माझ्यावर अजूनही मोठा प्रभाव आहे. आजकालच्या धकाधकीच्या जीवनात पूर्ण वारी करणे जमले नाही तरी ज्यांना शक्य आहे त्यांनी दोन तास वारीबरोबर चालून पहावे. यासाठी गंध टिळा लावण्याची गरज नाही. भक्तिधर्मातील आचार पाळता आले नाहीत तरी चार पावले वारीबरोबर चालले तर विचार नक्की भावेल.

हरीश दांगट

## अतिथी संपादक श्री हरीश दांगट यांचा अल्प परिचय-

वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत यांचे आयुष्य शेतावर गेले. शेती करता करताच त्यांनी ओतूर (पुणे जिल्हा) येथुन B.Sc. केले. त्यानंतर पुणे विद्यापीठातून M.Sc. आणी आय आय टी पवईमध्ये M.Tech. केले. गेली अकरा वर्ष ते अमेरीकेत सेमीकंडक्टर चिप डिझाईन करण्याचे काम करतात. त्यांचे सहा शोधनिबंध व तीन पेटंट्स प्रकाशीत झालेले आहेत.

गेले एक वर्षापासून त्यांना कविता करण्याचा छंद जडला आहे. त्यांच्या कविता मुख्यतः अध्यात्मिक अथवा ग्रामीण जीवनावर आधारीत असतात.



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतो आहे. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही. सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com

। शुभं भवतू ।